**लघुवाद न्यायालय, भास्कर इमारत, बांद्रा, मुंबई येथील न्यायालयीन इमारतीमध्ये अग्निशमन यंत्रणा बसविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र.याचिका ०५२३/प्र.क्र.९६/कार्यासन ११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १४ ऑगस्ट, २०२३

**वाचा** : १.मा.उच्च न्यायालयाचे पत्र क्र.B(W) ६०४२/२०१३/(Sum-१८२)/१०४५/२२०७५, दि.२७/४/२०२३.
२. लघुवाद न्यायालयाचे पत्र क्र.एससीसी/बीबी/डी-२/अग्निसुरक्षा/३३४/२०२२, दि.९/११/२०२२ व क्र. एससीसी/बीबी/डी-२/अग्निसुरक्षा/१६७/२०२३, दि.२७/७/२०२३
३. मुख्य अग्निशमन अधिकारी, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई, मुंबई फायर ब्रिगेड यांचे पत्र क्र.FBI/RIII/Gen/२५९/A, दि.२९/६/२०२२ व क्र.FBI/RIII/Gen/DD/१३८, दि.२१/९/२०२२.

**प्रस्तावना :**

लघुवाद न्यायालय, भास्कर इमारत, बांद्रा, मुंबई येथील न्यायालयीन इमारतीमध्ये अग्निशमन यंत्रणा उभारणी / अग्निप्रतिबंधक उपाययोजना करण्याबाबतची अंदाजपत्रक संदर्भीय अ. क्र.१ व २ येथील पत्रान्वये मान्यतेस्तव सादर केली आहेत. सदर अंदाजपत्रके सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी तपासून प्रशासकीय मान्यतेस सहमती दर्शविली आहे. त्यानुसार लघुवाद न्यायालय, भास्कर इमारत, बांद्रा, मुंबई येथे अग्निशमन यंत्रणा उभारणी / अग्निप्रतिबंधक उपाययोजना करण्याबाबतच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

लघुवाद न्यायालय, भास्कर इमारत, बांद्रा, मुंबई येथील न्यायालयीन इमारतीमध्ये अग्निशमन यंत्रणा उभारणी / अग्निप्रतिबंधक उपाययोजना करण्याच्या अनुषंगाने पुढील तक्यात नमूद कामांकरीता एकूण रु.६,०६,७१,०००/- ( अक्षरी रुपये सहा कोटी सहा लाख एकाहत्तर हजार फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास खालील अ ते इ बाबींची पूर्तता करण्याच्या अटीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे स्वरुप | अंदाजपत्रकीय रक्कम (रुपये) | सा.बां.विभागाने परिगणित केलेली अंदाजपत्रकाची किंमत (रुपये) |
|---|---|---|---|
| १ | Construction of Pump Room and Generator Room at Bahskar Building, Bandra. | ७१,९६,३८० | ७१,९६,००० |
| २ | Providing improvement to fire safely installation & Electrical Installation towards fire safety measure's at Bahskar Building, Bandra. | ५,४७,९४,४७२ | ५,३४,७५,००० |
| | **एकूण** | **६,१९,९०,८५२** | **६,०६,७१,०००** |

अ. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

ब. प्रस्तावातील खरेदीशी संबंधित बाबींकरीता उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दि.२४/८/२०१७ व दि.७/५/२०२१ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

क. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१०/१/२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

ड. सदर कामाची ई-निविदा करताना कामाचे तुकडे न करता एकत्रित निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

इ. सदर कामाबाबत व्दिरुक्ती/ दुबार होणार नाही, याची खातरजमा संबंधित विभाग प्रमुख यांनी करावी.

२. यावर होणारा खर्च " मागणी क्र.जे-१,२०१४ न्यायदान, १०६ लघुवाद न्यायालये, (००),(००)(०१) इलाखा शहर न्यायालये, (अनिवार्य) (२०१४ ०२१६) (अनिवार्य), २७ लहान बांधकामे" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व तो पुरवणी मागणी /पुनर्विनियोजनाद्वारे / सुधारित अंदाजामध्ये मागणी करुन भागवावा आणि आवश्यकतेनुसार त्या त्या आर्थिक वर्षासाठी आवश्यक तेवढी तरतूद त्या त्या वित्तीय वर्षाचे अर्थसंकल्पीय अंदाज सादर करताना प्रस्तावित करुन त्याद्वारे भागवावा.

३. सदर कामाची निविदा मागविण्यापूर्वी अग्नीशमन अधिकारी यांनी निश्चित केलेल्या उपाय योजनांमधील कामे असल्याची खातरजमा तसेच अग्नीशमन अधिकारी यांनी सुचविलेल्या उपाययोजनांचे अनुपालन होईन याची दक्षता विभाग प्रमुख यांनी घ्यावी.

४. प्रस्तुत शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.१३६/२०२३/इमा.२ दि.२१/७/२०२३ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने तसेचवित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक:विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.२०/९/२०१९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग-१, उप विभाग-५, अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४(३) मधील तरतुदीनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे .

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०८१४१६१३१६१९१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

HEMANGI AJIT SHETYE

Digitally signed by HEMANGI AJIT SHETYE
DN: CN = HEMANGI AJIT SHETYE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = LAW AND JUDICIARY DEPARTMENT
Date: 2023.08.14 16:15:05 +05'30'

**( हेमांगी शेट्ये )**

**कार्यासन अधिकारी**

**प्रत**

१) प्रबंधक (निरीक्षणे-१/२),उच्च न्यायालय, मुंबई.

२) मुख्य न्यायाधीश, लघुवाद न्यायालय, मुंबई.

३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा),महाराष्ट्र, मुंबई.

४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

५) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.

६) विधी व न्याय विभाग, कार्यासन २३/२४, मंत्रालय, मुंबई.

७) निवडनस्ती.